**अर्थसंकल्पिय अनुदान सन २००९-२०१०**

**मागणी क्र.वाय-४, २७०२ लहान पाटबंधारे भूजल संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना (योजनेतर)**

**महाराष्ट्र शासन**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,

शासन निर्णय, क्र.बीयुडी-१००९/प्र.क्र.१०७ /पापु-१५,

मंत्रालय, मुंबई -४०००३२

दिनांक-३० जून, २००९.

**वाचा**- १. शासन निर्णय, समक्रमांक दि.२४ एप्रिल, २००९.

२. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांचे क्र संचा/लेखा/अनु पुर्नवाटप/३५५/०९, दिनांक २० मे, २००९ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

सन २००९-२०१० या आर्थिक वर्षासाठी भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या आस्थापनेचा व इतर खर्च भागविण्यासाठी मागणी क्र वाय-४, "२७०२ लहान पाटबंधरे भूजल संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना " या लेखाशिर्षाखाली रु.१८५१.४४ लक्ष इतकी दत्तमत्त तरतूद अर्थसंकल्पात करण्यात आली असून चार महिन्याचा खर्च भागविण्यासाठी त्यापैकी, रु.५९१.८३ लक्ष दत्तमत्त इतकी तरतूद संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांना संदर्भाधिन शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिली आहे.

संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांना उपलब्ध करुन दिलेल्या लेखानुदान तरतूदीमधून "अतिकालिक भत्ता व देशांतर्गत प्रवास भत्ता" या उद्दीष्टामधील तरतूद पुनर्वितरणाने उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या आस्थापना व इतर खर्च भागविण्याकरीता मागणी क्र. वाय-४ "२७०२- लहान पाटबंधरे भूजल संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना " या लेखाशिर्षा खाली रु.१८५१.४४ लक्ष इतकी दत्तमत्त तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. त्यापैकी रु.५९१.८३ लक्ष दत्तमत्त इतकी तरतूद लेखानुदान म्हणून संदर्भाधिन दिनांक २४ एप्रिल, २००९ च्या शासन निर्णयान्वये संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांच्याकडे सुपूर्द व मूक्त करण्यात आली आहे.

२. प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, या तरतूदीचे खालीलप्रमाणे पुनर्वितरण करण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| अ.क्र | उपशिर्ष | सन २००९-१० करीता मंजूर लेखानुदान | पुनर्वितरीत करावयाची तरतूद | पुनर्वितरणानंतर उपलब्ध तरतूद |
|---|---|---|---|---|
| १. | ०३-अतिकालिक भत्ता, | ०.०७ | (+) ३.७६ | ३.८३ |
| २. | ११-देशांतर्गत प्रवास भत्ता | १५.०२ | (-) ३.७६ | ११.२६ |
| | | १५.०९ | | १५.०९ |

३.	मंजूर तरतूदीतून संचालकांनी मासिक खर्च सुधारीत विवरणपत्राप्रमाणे (Monthly Cash Flow) करावा. सदर खर्च मागणी क्र.वाय-४, २७०२-लहान पाटबंधारे -०२ भूजल-००५ अन्वेषण-(०१) (०१) भूजल संपत्तीचे अन्वेषण व विकास आस्थापना (२७०२ ३९१८) दत्तमत या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

४.	महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका, नियम १६६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-१०००/प्र.क्र. ४६/२००१/विनियम, दिनांक ११.०७.२००१ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उप विभाग-३,अ.क्र.३ नुसार सदर आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

१.	हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra. gov.in** या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०६३०१५४९१७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(श.वि.दुर्वे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सर्व
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक , भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,सर्व
४. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई/२ नागपूर (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता)
६. वित्त विभाग, अर्थसंकल्प-१८ ( २ प्रती)
७. कक्ष अधिकारी/ लेखा अधिकारी,पापु-०४, पापु-०७, पापु-०८, पापु-२०
८. निवड नस्ती पापु-१५